महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील २२१० जी ८६१ या लेखाशिर्षाखालील निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२१/प्र.क्र.९९ /आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: २४ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दि.२६ फेब्रुवारी, २०१९.
२) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्रमांक: राआहसो /लेखा /प्रअ /९८३९/१६४२/२०२१ दिनांक ०८/१०/२०२१
३) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे पत्र क्रमांक: राआहसो /लेखा /प्रअ /९८३९/६५/२०२२ दिनांक १७/०१/२०२२
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.०७/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १६/१२/२०२१ व दिनांक २४/१२/२०२१
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.१७/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २१/०३/२०२२
७) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२१/प्र.क्र.९९/आरोग्य-६, दि.१० जानेवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

वरील वाचा येथील संदर्भ क्रमांक ७ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेचे आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी ८६१ (SCP) या लेखाशिर्षाखाली रु. १५२.०० कोटी (अक्षरी रूपये एकशे बावन्न कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर योजनेच्या लाभार्थ्यांसाठी माहे जानेवारी, २०२२ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीतील विमा हप्ता विमा कंपनीस अदा करण्याकरीता रु.३२,१३,३६,२५८/-(अक्षरी रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठ्ठावन्न फक्त) व हमी तत्वावरील दाव्यांच्या अदायगीसाठी रु.८,५९,२९,८६९/-(अक्षरी रुपये आठ कोटी एकोणसाठ लक्ष एकोणतीस हजार आठशे एकोणसत्तर मात्र) असा एकूण रु.४०,७२,६६,१२७/-(अक्षरी रुपये चाळीस कोटी बाहत्तर लक्ष सहासष्ट हजार एकशे सत्ताविस मात्र) इतका निधी २२१० जी ८६१

(SCP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचा विमा हप्ता व हमी तत्वावरील दावे अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून माहे जानेवारी, २०२२ ते माहे मार्च, २०२२ या कालावधीतील विमा हप्ता रु.३२,१३,३६,२५८/-(अक्षरी रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठ्ठावन्न फक्त) व हमी तत्वावरील दाव्यांच्या अदायगीसाठी रु. ८,५९,२९,८६९/-(अक्षरी रुपये आठ कोटी एकोणसाठ लक्ष एकोणतीस हजार आठशे एकोणसत्तर मात्र) असा एकूण रु.४०,७२,६६,१२७/-(अक्षरी रुपये चाळीस कोटी बाहत्तर लक्ष सहासष्ट हजार एकशे सत्ताविस मात्र) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रकमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सासेसायटीच्या नावे काढण्यात यावा.

**मागणी क्र. एन-३**

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
७८९ - अनुसूचित जाती उप-योजना
(०१)-अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना
(०१)(०३)-महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (कार्यक्रम)
२२१० जी ८६१ (दत्तमत), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२. सदर निधी राज्य आरोग्य हमी सोसायटी, महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना या खात्यामध्ये रु.३२,१३,३६,२५८/-(अक्षरी रुपये बत्तीस कोटी तेरा लक्ष छत्तीस हजार दोनशे अठ्ठावन्न फक्त) व राज्य आरोग्य हमी सोसायटी कोविड-१९ या खात्यामध्ये रु.८,५९,२९,८६९/-(अक्षरी रुपये आठ कोटी एकोणसाठ लक्ष एकोणतीस हजार आठशे एकोणसत्तर मात्र) एवढा निधी जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक २१ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयाद्वारे दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, सदर निर्णयातील नमुद अटींची पुर्तता झाली आहे.

५. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या दिनांक २१ मार्च, २०२२ च्या

शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ. सं. क्र.८३/व्यय-१४, दिनांक २४/०२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०३२२१०४१०९२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2022.03.24 17:59:53 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३प्रती)
९. कक्ष अधिकारी (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई-३२.
११.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती.